सामान्य प्रशासन विभाग (खुद) साठी बाहय यंत्रणेकडून मासिक दराने वाहनचालक पुरविण्यासाठी दिनांक दि.१.११.२०२१ ते दिनांक ३१.१०.२०२२ या कालावधीसाठी दरकरार करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. बावासे-२०२०/प्र.क्र.३४ (भाग-१)/का.२४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ०१ नोव्हेंबर, २०२१

वाचा :- सामान्य प्रशासन विभागाने दिनांक २३ सप्टेंबर २०२१ रोजी शासनाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द केलेली निविदा सूचना.

प्रस्तावना : -

सामान्य प्रशासन विभाग(खुद्द) पदांचा आकृतीबंध दिनांक १४ मे २००४ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आला असून त्यानुसार वाहनचालकांची १३ पदे मंजूर होती. १ पद अल्पसंख्याक विभागाकडे दिनांक ४ एप्रिल २००८ च्या शासन निर्णयान्वये हस्तांतरीत करण्यात आल्यामुळे विभागात वाहनचालकांची १२ पदे मंजूर आहेत. विभागातील वाहन आढावा दिनांक २७ सप्टेंबर २०११ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आला असून आढाव्याअंती एकुण ९ वाहने विभागासाठी मंजूर आहेत. सामान्य प्रशासन विभाग(खुद्द) मध्ये ९ वाहने असून ४ शासनाचे वाहनचालक कार्यरत आहेत. उर्वरित वाहनांसाठी कंत्राटी वाहनचालक नियुक्त करण्याची बाब विचाराधीन आहे. कंत्राटी वाहनचालक नियुक्त करण्यासाठी वित्त विभाग, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक पदनि २०१३/प्र.क्र.११/१३विसु-१,दिनांक ०२-०२-२०१३ मधील तरतुदीनुसार निविदा मागवून बाह्ययंत्रणेव्दारे वाहनचालक पुरविण्यासाठी कंत्राटदाराची नेमणूक करुन त्यांच्याकडून मासिक दराने वाहन चालक नियुक्त करण्याची पध्दती अवंलबिण्यात आली आहे.

२. मे. क्रिष्णा मोटर्स, जोगेश्वरी, मुंबई यांच्याशी वाहनचालक पुरविण्याबाबतचा सेवाकरार दिनांक ३० सप्टेंबर २०२१ रोजी समाप्त झाला होता. नविन निविदा प्रक्रिया अंतिम होईपर्यंत दिनांक ३१ ऑक्टोबर २०२१ पर्यंत मे. क्रिष्णा मोटर्स, जोगेश्वरी, मुंबई यांना वाहनचालक पुरविण्याची सेवा सुरु ठेवण्यात आली होती. नविन निविदाकार नियुक्त करण्याची प्रक्रिया पूर्ण झाल्यामुळे मे. क्रिष्णा मोटर्स, जोगेश्वरी, मुंबई यांचा सेवाकरार दिनांक ३१ ऑक्टोबर , २०२१ ( म.नं.) समाप्त करण्यात आलेला आहे. त्यामुळे त्यांच्याकडून घेण्यात आलेल्या ५ वाहनचालकांच्या सेवा दिनांक ३१ ऑक्टोबर २०२१ ( म.नं.) परत करण्यात आल्याचे दिनांक १ नोव्हेंबर २०२१ च्य पत्रान्वये कळविण्यात आलेले आहे.

३. नवीन दरकरार करण्यासाठी शासनाच्या संगणक संकेतस्थळावरुन दिनांक २३ सप्टेंबर २०२१ च्या पत्रान्वये (दिनांक १.१०.२०२१ ते ३०.९.२०२२) एक वर्ष कालावधीसाठी मासिक दरावर वाहनचालक पुरविण्याबाबत ई-निविदा शासनाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आली होती. त्यानुसार ८ निविदाधारकानी त्यांच्या निविदा सादर केलेल्या होत्या. २ निविदा तांत्रिकस्तरावर अपात्र ठरल्यामुळे ६ निविदा दिनांक २० ऑक्टोबर २०२१ रोजी दुपारी ३.०० वाजता उघडण्यात आल्या असून त्यांनी सादर केलेले वाहनचालक पुरविण्याचे दर पुढीलप्रमाणे आहेत.

| कंपनीचे नाव | वाहनचालकाच्या वेतनाचा मासिक ठोक दर. वाहनचालकाचा दिवसाचा कामकाजाचा कालावधी ९ तास राहील **(सकाळी ९.०० ते संध्या.६.०० )** | दररोजच्या ९ तासापेक्षा जास्त काम झाल्यास शासनाच्या प्रचलित दराने अतिकालिक भत्ता वाहनचालकास देय राहील (रु. ४०/-). | मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाच्या हद्दीबाहेर जावे लागल्यास वाहनचालकाच्या भत्याचा दर . | वाहनचालकास रात्रौ १०.०० वा. नंतर थांबावे लागल्यास त्याच्या जेवण भत्याचा दर . | वाहनचालकास रात्रौ ११.०० वा. नंतर थांबावे लागल्यास त्याच्या घरी जाण्याच्या प्रवास भत्याचा दर. |
|---|---|---|---|---|---|
| मे.SIGMA TECHWFRA,MUMBAI | २९५००/- | ४०/- | ५००/- | २००/- | ४००/- |
| मे.SUPER FACILITY SERVICES PVT LTD.KANJURMARG | ३००००/- | ४०/- | ३५०/- | १५०/- | ३००/- |
| **मे. व्ही.पी.फॅसिलिटी सर्विसेस प्रा.लि. नवी मुंबई** | १४८००/- | ४०/- | ३००/- | १५०/- | २००/- |
| मे. क्रिष्णा मोटर्स,जोगेश्वरी, मुंबई | १५०२५/- | ४०/- | ३००/- | १५०/- | २००/- |
| मे.लोकभारती बेरोजगार सेवा सहकारी संस्था मर्या,मुंबई | २१०९६/- | - | ३००/- | १५०/- | २००/- |
| मे SUPPORT FACILITIES PVT LTD, MUMBAI | १७३००/- २४२२+ ३५५० २३२७२ | ४०/- | ३००/- | १५०/- | २००/- |

## शासन निर्णय :-

उपरोक्त दरपत्रके पहाता **मे. व्ही.पी.फॅसिलिटी सर्विसेस प्रा.लि. नवी मुंबई** यांचे दरपत्रक सर्वात कमी असल्यामुळे **दिनांक ०१/११/२०२१ ते ३१/१०/२०२२ एक वर्ष कालावधीसाठी** मासिक दरावर ५ वाहनचालक पुरविण्याबाबत त्यांच्याशी करार करण्यास शासन मंजूरी देत आहे.

### निविदेच्या अटी व शर्ती पुढील प्रमाणे आहेत:-

१. वाहनचालक पदाची सेवा ही पूर्णपणे कंत्राटी व तात्पुरत्या स्वरुपाची असून नियुक्त वाहनचालकांना भविष्यात या पदावर कोणताही अधिकार प्राप्त होणार नाही, हे वाहनचालक पुरवठा संस्थेचे प्रतिनिधी म्हणूनच सेवा देतील.

२. वाहनचालक पदावरील कर्मचारी यांना शासकीय कर्मचारी म्हणून गणले जाणार नाहीत.

३. वाहनचालक भारतीय नागरीक असावा तसेच त्यास मराठी लिहिता / वाचता / बोलता येणे आवश्यक राहील.तसेच हिंदी ,इंग्रजीचे किमान ज्ञान असावे.

४. वाहनचालकाचे वय १८ वर्षे पुर्ण असावे व ५८ वर्षापेक्षा जास्त नसावे.

५. वाहनचालकासोबत त्याचा वाहन चालविण्याचा वैद्य अनुज्ञप्ती ( LICENCE ) असेल. त्याशिवाय त्याचे ओळखपत्र (आधारकार्ड/निवडणूक ओळखपत्र/पॅन कार्ड यापैकी एक) त्याच्याकडे सोबत असणे आवश्यक आहे.

६. संस्थेतर्फे पुरविण्यात येणारा वाहनचालक गुन्हेगारी पार्श्वभूमीचा / प्रवृत्तीचा नसावा. त्यासंदर्भात कंत्राट दिल्यानंतर संबधित संस्थेने सर्व वाहनचालकांचे पोलीस तपासणी अहवाल एक महिन्यात देणे बंधनकारक राहील. याप्रमाणे पोलीस तपासणी अहवाल अनुकुल असलेले वाहनचालक स्विकारण्यात येतील. अन्य वाहनचालकांच्या सेवा स्विकारण्यात येणार नाहीत.

७. वाहनचालकाचा गणवेश तथा त्याचे राहणीमान स्वच्छ व टापटिपीचे असावेत.तसेच वाहन चालकाने डयुटीवर असतांना नशापान/धुम्रपान व तंबाखूजन्य पदार्थांचे सेवन करु नये.

८. वाहनास अपघात झाल्यास व दुर्दैवाने वाहन चालकास गंभीर स्वरुपात इजा झाल्यास वाहनचालकास वैद्यकीय खर्च अथवा नुकसान भरपाईचे कोणतेही दायित्व शासनावर असणार नाही, त्याची संपुर्ण जबाबदारी संस्थेची राहील.

९. वाहनचालकाने वाहनाची व वाहनातील ॲसेसरीजची काळजी/देखभाल करावी, त्यास नुकसान पोचविल्यास संस्था जबाबदार राहील.

१०. कंपनी/संस्थेतर्फे काम करणाऱ्या वाहनचालकाच्या सेवेचे कोणतेही उत्तरदायित्व शासनावर असणार नाही.

११. वाहन चालक पुरवठादाराने शासनाने निर्धारित केलेल्या किमान वेतन दराने वेतन व वेळोवेळी लागू असलेले अनुज्ञेय भत्ते वाहन चालकांस अदा करणे बंधनकारक आहे. तसेच वाहन चालकांना देय असलेले कायदेशिर दायित्व उदा. पी. एफ., इ.एस.आय.एस., कामगार वेल्फेअर फंड, बोनस, अन्य भत्ते इत्यादी बाबी वाहनचालकांच्या वेतनातून कपात करुन संबधित प्राधिकरणांकडे जमा करण्याची जबाबदारी संस्थेची राहिल. याबाबत शासनाची कोणतीही जबाबदारी रहाणार नाही.

१२. वाहनचालकाचा प्रत्येक दिवसाचा कामकाजाचा कालावधी ९ तास राहील.

१३. वाहनचालकांची कामाची वेळ सकाळी ९.०० ते संध्याकाळी ६.०० असून वाहनचालकाच्या सेवा ९ तासापेक्षा जास्त झाल्यास शासनाच्या रु.४०/-प्रति तास या प्रचलित दराने अतिकालिक भत्ता वाहन चालकास देय होईल.

१४. मुंबई / बृहनमुंबई (मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाच्या हददीच्या) बाहेर जावे लागल्यास वाहनचालकास भत्ता तसेच रात्रौ १०.०० वा. नंतर थांबल्यास जेवण भत्ता तसेच रात्रौ ११.०० नंतर थांबल्यास त्याच्या जाण्याच्या प्रवास भत्याचा दर निविदेत नमुद केल्यानुसार देय राहील.

१५. ज्यावेळी एखादा वाहन चालक रजा घेतो त्यावेळी त्याऐवजी बदली वाहन चालक पुरविण्याची जबाबदारी संस्थेची राहिल. तसेच ज्यावेळी अतिरिक्त वाहनचालकाची मागणी करण्यात येईल तेवढया कालावधीसाठी वाहनचालक पुरविणे बंधनकारक राहिल.

१६. वाहन चालकास आठवडयातून एक दिवस साप्ताहिक सुट्टी असेल.शक्यतो रविवारी १ सुट्टी अनुज्ञेय राहील. सुट्टीच्या दिवशी कार्यालयात बोलविल्यास काम केलेल्या तासाप्रमाणे अतिकालिक भत्ता अनुज्ञेय राहील.

१७. कराराचे पालन समाधानकारक न झाल्यास करार केव्हीही संपुष्टात आणणे तसेच कराराची मुदत वाढविणे याबबातचा निर्णय अपर मुख्य सचिव (सेवा) यांच्यास्तरावर घेण्यात येईल.

१८. कर्तव्यावर असताना वाहनचालकाची वागणूक शिष्ट संमत असावी. उदा. वाहनचालकाने वाहतुकीचे नियम पाळावे, वागणूक सौजण्याची असावी. वाहनाजवळ वाहनचालकाने उपलब्ध असावे.इ.

१९. वाहनचालकाकडे मोबाईल असावा, तथापि त्यांनी वाहन चालवित असताना मोबाईलचा वापर करु नये.

२०. पुरवठादाराचे प्रदान फक्त ईसीएस/ एनईएफटी/ आरटीजीएस व्दारेच करण्यात येईल.त्यासाठी कोअर बँकींगची सुविधा असलेल्या बँकेत खाते उधडणे बंधनकारक राहील.

२१. वाहनचालकांना मासिक वेतन व भत्ते विहित वेळेत अदा करणे संस्थेची जबाबदारी राहील.

२२. वाहनचालकांचे वेतन व भत्ते कोणत्याही परिस्थितीत कोणतेही कारण न देता प्रती माह दिनांक ०५ रोजी संस्थेमार्फत अदा करण्यात यावेत.

२३. संस्थेस किंवा शासनास दर करार संपुष्टात आणावयाचा झाल्यास तीन महिन्यांची आगाऊ नोटीस देणे आवश्यक राहील.

२४. कंपनी/संस्थेमार्फत काम करणा-या वाहनचालकांना दरमहा निश्चित केलेले वेतन निश्चित केलेल्या दिनांकास अदा करण्याची जबाबदारी ही कंपनी/संस्थेची राहील.

२५. किमान वेतन कायदा तसेच कामगार अधिनियमातील ( लेबर लॉ) ज्या ज्या तरतूदी विहित केल्या आहेत, त्यांचे पालन पुरवठादाराने करणे बंधनकारक आहे.

२६. करारासंबधी काही न्यायालयीन प्रकरण उदभवल्यास त्याचे कार्यक्षेत्र मुंबई राहील.

२७. करारातील अटी व शर्ती मान्य असल्याबाबत व विहित वेळेत वाहनचालक पुरविण्याबाबत रु.१००/- स्टॅम्पपेपरवर नोटराईज्ड करारनामा करुन घेणे आवश्यक राहील.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१११११५३६५३७००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR PITAMBAR PAWAR

Digitally signed by TUSHAR PITAMBAR PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0e7c2b89250ac281fa15181edd75966aecf408d6530259d654b6605cd5fc363d, pseudonym=3DABC7D7E9E69EE45ABF69F98A9F7C12C207A7CB, serialNumber=8B620EC181468E9AE13715CE8039879786D8786251F299A0EBE5B1878CD6E05C, cn=TUSHAR PITAMBAR PAWAR
Date: 2021.11.11 15:41:52 +05'30'

**( तु. पि. पवार )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र , मुंबई
२. महालेखापाल ( लेखापरिक्षा ) मुंबई
३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी , मुंबई
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५. वित्त विभाग (वि.सु) / विनियम कार्यासन, मंत्रालय, मुंबई
६. **मे. व्ही.पी.फॅसिलिटी सर्विसेस प्रा.लि. नवी मुंबई**
७. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (आस्थापना), मंत्रालय, मुंबई-३२
८. अवर सचिव ( रोखशाखा),सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई
९. कार्यासन अधिकारी ( रोखशाखा),सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई
१०. निवडनस्ती/का.२४,सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई.